**सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशींच्या अनुषंगाने अखिल भारतीय सेवेतील महाराष्ट्र संवर्गातील अधिकाऱ्यांची वेतननिश्चिती--- थकबाकीच्या रकमांचे प्रदान / प्रतीपूर्ती कार्यपध्दती.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन शुध्दीपत्रक क्र. भाप्रसे-११०८/प्र.क्र.२८८/०८/९अ
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक - २४ जून, २००९

वाचा : १) सा.प्र.वि.शा.नि.क्र. भाप्रसे-११०८/प्र.क्र.२८८/०८/९अ, दि. २० जानेवारी, २००९
२) केंद्र शासनाच्या कार्मिक व प्रशिक्षण विभागाचे दि. २० फेब्रुवारी, २००९ चे कार्यालयीन ज्ञापन.

**शुध्दीपत्रक**

६ व्या वेतन आयोगाच्या शिफारशींच्या अनुषंगाने अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांचे वेतन सुधारित झाल्यामुळे त्यांना देय ठरणारी वेतन व भत्त्यांची थकबाकी कशाप्रकारे अदा करण्यात यावी, यासंदर्भातील कार्यपध्दती सा.प्र.वि.शा.नि.क्र. भाप्रसे-११०८/प्र.क्र.२८८/०८/९अ, दि. २० जानेवारी, २००९ नुसार विहित करण्यात आलेली आहे. त्यामधील अ.क्र.४ नुसार दि. १.१.२००६ रोजी केंद्र शासनाकडे प्रतिनियुक्तीने कार्यरत असलेल्या व तदनंतर राज्य शासनाच्या सेवेत प्रत्यावर्तीत होऊन थकबाकी प्रदान करण्याच्या दिनांकास राज्य शासनाकडे कार्यरत असणाऱ्या अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांच्या बाबतीत, तो अधिकारी कार्यरत असणाऱ्या कार्यालयाच्या / विभागाच्या आहरण व संवितरण अधिकाऱ्यांने, केंद्र शासनाच्या संबंधित कार्यालयाकडून ना प्रदान प्रमाणपत्र प्राप्त करुन घेऊन, थकबाकीचे प्रदान करावे अशी कार्यपध्दती ठरविण्यात आलेली आहे.

२ तथापि, त्यानंतर केंद्र शासनाच्या कार्मिक व प्रशिक्षण विभागाने त्यांच्या दि. २० फेब्रुवारी, २००९ च्या कार्यालयीन ज्ञापनान्वये असा निर्णय घेतला आहे की, दि. १.१.२००६ ते दि. ३१.८.२००८ या कालावधीत केंद्र शासनाकडे प्रतिनियुक्तीने कार्यरत असलेले अखिल भारतीय सेवेतील अधिकारी जरी दरम्यानच्या कालावधीत राज्य शासनाकडे प्रत्यावर्तीत झाले असले तरी त्यांनी केंद्र शासनाकडे केलेल्या सेवा कालावधीतील वेतनाची थकबाकी ( ६ व्या वेतन आयोगानुसार वेतन सुधारित झाल्यामुळे देय) केंद्र शासनाच्या संबंधित विभागाने अदा करावी. सा.प्र.वि.शा.नि.क्र. भाप्रसे-११०८/प्र.क्र.२८८/०८/९अ, दि. २० जानेवारी, २००९ मधील तक्त्यातील अ.क्र.४ मध्ये खालील प्रमाणे तरतूद आहे.

| अ.क्र. | दिनांक १.१.२००६ रोजी अधिकारी कार्यरत असलेला विभाग / कार्यालय | थकबाकी प्रदान करण्याच्या दिनांकास अधिकारी कार्यरत असलेला विभाग / कार्यालय | थकबाकी प्रदान करण्याची कार्यवाही |
|---|---|---|---|
| ४ | केंद्रे शासनाकडे प्रतिनियुक्तीवर कार्यरत | राज्य शासनाच्या सेवेत प्रत्यावर्तीत होऊन राज्य शासनाच्या कार्यालयात / विभागात कार्यरत | सध्या कार्यरत असणाऱ्या कार्यालयाच्या / विभागाच्या आहरण व संवितरण अधिकाऱ्याने केंद्र शासनाच्या संबंधित कार्यालयाकडून ना-प्रदान प्रमाणपत्र प्राप्त करुन घेऊन, थकबाकीचे प्रदान करावे. |

[कृ.मा.प.

अ.क्र. ४ येथील वरील तरतूद वगळून त्याऐवजी खालील प्रमाणे अ.क्र.४ व ४अ तरतूद अंतर्भुत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | दिनांक १.१.२००६ रोजी अधिकारी कार्यरत असलेला विभाग / कार्यालय | थकबाकी प्रदान करण्याच्या दिनांकास अधिकारी कार्यरत असलेला विभाग / कार्यालय | थकबाकी प्रदान करण्याची कार्यवाही |
|---|---|---|---|
| ४ | केंद्र शासनाकडे प्रतिनियुक्तीवर कार्यरत | राज्य शासनाच्या सेवेत प्रत्यावर्तीत होऊन राज्य शासनाच्या कार्यालयात / विभागात कार्यरत | केंद्र शासनाकडे केलेल्या सेवा कालावधीतील थकबाकी केंद्र शासनाच्या संबंधित विभागाने अदा करावी. राज्य शासनाच्या कार्यालयात / विभागातील सेवा कालावधीची थकबाकी राज्य शासनाच्या संबंधित कार्यालय / विभागाने अदा करावी. केंद्र शासनाकडे केलेल्या सेवा कालावधीतील थकबाकी राज्य शासनाच्या कार्यालय / विभागाने अदा केली असल्यास सदर रकमेची प्रतीपुर्ती केंद्र शासनाच्या संबंधित विभागाकडून प्राप्त करुन घेण्यात यावी. |
| ४-अ | राज्य शासनाच्या कार्यालयात / विभागात कार्यरत | केंद्र शासनाकडे प्रतिनियुक्तीने कार्यरत | राज्य शासनाच्या कार्यालयात / विभागात कार्यरत असलेल्या कालावधीतील थकबाकीची मागणी केंद्र शासनाच्या संबंधित विभागाने केल्यास राज्य शासनाच्या संबंधित कार्यालय / विभागाने अशा कालावधीतील थकबाकीची प्रतीपुर्ती केंद्र शासनास करावी. |

३ हे शुध्दिपत्रक वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र. २४९/सेवा-९, दि. १५.६.२००९ च्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४ सदर शासन शुध्दिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.mahrashtra.gov.in या साईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २००९०६२४१२५८२८००१ असा आहे.

५ महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

रो.स.भालेकर
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
४) महालेखापाल (ले. व अ.) महाराष्ट्र-१, मुंबई,
५) महालेखापाल (ले. व अ.) महाराष्ट्र-२, नागपूर
६) महालेखापाल (ले.प.)महाराष्ट्र-१, मुंबई
७) महालेखापाल (ले.प.) महाराष्ट्र-२, नागपूर
८) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
११) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१२) मंत्रालयीन सर्व प्रशासकीय विभाग
१३) वित्त विभाग- सेवा-९, व्यय-४, अर्थ-२५, व कोषा-५
१४) सर्व विभागीय आयुक्त,
१५) सर्व जिल्हाधिकारी,
१६) सर्व जिल्हा परिषदा (मुख्य कार्यकारी अधिकारी)
१७) गृह विभाग } त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी हे आदेश त्यांच्या
१८) महसूल व वन विभाग } अधिपत्याखालील सर्व संबंधितांच्या नजरेस आणावे.
१९) महासंचालक आणि पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र शासन, मुंबई
२०) प्रधान मुख्य वन संरक्षक, महाराष्ट्र शासन, पुणे
२१) सर्व भाप्रसे अधिकारी
२२) महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्याखालील सर्व संबंधित सांविधिक व सार्वजनिक उपक्रम, महामंडळ, सर्व महानगरपालिका
२३) सचिव, कार्मिक व प्रशिक्षण, प्रशासकीय सुधार व लोक तक्रारी आणि पेंशन मंत्रालय, नवी दिल्ली,
२४) महाराष्ट्र संवर्गातील भाप्रसे अधिकारी कार्यरत असलेले केंद्र शासनाचे विभाग / मंत्रालये
२५) महाराष्ट्र संवर्गातील भाप्रसे अधिकारी कार्यरत असलेले केंद्र शासनाचे उपक्रम, महामंडळे, स्वायत्त संस्था,
२६) सा.प्र.वि. कार्या- ९,१०, १४, १४-ब, १९-अ, २४, २६
२७) निवड नस्ती

---------